<u>नवीन लेखाशीर्ष निर्माण करण्याबाबत</u>
**“राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचनेअंतर्गत (STCCS) जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांचे सक्षमीकरणासाठी सहाय्य”या योजनेसाठी (२४२५ २५२४)**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. बीयुडी ०७१६/प्रक्र २२६/२-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक : १९ नोव्हेंबर, २०१६

<u>वाचा</u> :-१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक सीसीआर १४०६/प्र.क्र.२४७/२-स दिनांक १७/५/२००६
२) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक सीसीआर ०३१३/प्र.क्र.१४४/२-स दिनांक ५/९/२०१४

**<u>प्रस्तावना :-</u>**

उपरोक्त वाचा क्र २ शासन निर्णय दिनांक ५.९.२०१४ नुसार शासनामार्फत सध्या जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना १.७५% व १.२५% दराने देण्यात येणा-या व्याज परताव्याच्या धोरणात अंशत: बदल करुन राज्यातील सर्व जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना १.५% व वाढीव १% असा एकूण २.५% दराने व्याज परतावा प्रत्येक वर्षी मंजूर करण्यात आला आहे. हे अर्थसहाय्य सन २०१४-१५ या आर्थिक वर्षापासून करण्यात येणा-या पीक कर्ज वाटपावर अदा करण्यात यावे. या अनुषंगाने सुरु करावयाच्या **“राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचनेअंतर्गत (STCCS) जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांचे सक्षमीकरणासाठी सहाय्य”** या योजनेतर योजनेसाठी (Non Plan) नवीन लेखाशिर्ष निर्माण करावयाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

**“राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचनेअंतर्गत (STCCS) जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांचे सक्षमीकरणासाठी सहाय्य”** या योजनेतर योजनेकरीता खालीलप्रमाणे नवीन मुख्य लेखाशिर्ष सुरु करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. :-

| | |
|---|---|
| मागणी क्रमांक व्ही-०२<br>२४२५-- सहकार<br>(००)(१०७) सहकारी पतसंस्थांना सहाय्य<br>(०१) सहकारी पतसंस्थांना सहाय्य<br>(०१) (१६)राज्यातील अल्पमुदत सहकारी पतसंरचने अंतर्गत जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांचे सक्षमीकरणासाठी सहाय्य<br>३३- अर्थसहाय्य (दत्तमत) (योजनेतर)<br>(२४२५ २५२४) | Demand No. V-२<br>2425– Co-operation<br>(00)(107) Assistance to Credit Co-operatives<br>(01) Assistance to Credit Co-operatives<br>(01) (16) Assistance for Strengthening of District Central Co-operative Banks under Short Term Co-operative Credit Structure<br>33, Subsidies (Voted)(Non Plan)<br>(2425 2524) |

२. या योजने अंतर्गत सन २०१७-१८ करीता अर्थसंकल्पीय तरतूद उपलब्ध करण्याबाबतचा एकत्रीत प्रस्ताव वित्तीय प्रपत्रात सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे कार्यालयाने शासनास संबंधित योजना अंमलबजावणी करणा-या कार्यासनास सादर करावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३८५/अर्थसंकल्प-१३/१६, दिनांक २९.७.२०१६ अन्वये तसेच क्र ५०२/अर्थ-१३, दि २८.१०.२०१६ व महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)१ महाराष्ट्र, मुंबई अनौपचारिक संदर्भ क्रमांक ख.वि/चा-१/स.प.व व.वि./ युओआर ७२/२०१६-१७/६२४, दिनांक २६/९/२०१६ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६१११९१५२४४९१००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Deepak M Rane

Digitally signed by Deepak M Rane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMTD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2aef4bf230b6667b08affe7946621e30ca1ff655241ee17d2cbdfd697d7222f5, cn=Deepak M Rane
Date: 2016.11.19 15:27:30 +05'30'

**( दि.म. राणे)**
कार्यासन अधिकारी.

**प्रत :-**

१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
४) अधिदान व लेखा अधिकारी, पुणे
५) निवासी व लेखा परीक्षा अधिकारी, पुणे.
६) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
७) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, (सर्व)
८) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)
९) सर्व जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका / महाराष्ट्र राज्य सहकारी बँक. मुंबई
१०) वित्त विभाग (अर्थसंकल्प-१३/ व्यय -२), मंत्रालय, मुंबई
११) अवर सचिव (कार्यासन १७-स) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) लेखा व कोषागारे संचालनालय, (संगणक शाखा) मुंबई
१३) निवड नस्ती (कार्यासन २-स)